


हात सुटता हातातूनी
उरल्या आठवणी..
कविता माझी एक पानी
शब्दांनी तुला कवळणारी
अन बाकी पानं कोरी
विरहाने भिजलेली..

ई-साहित्य प्रकाशन

# नेटाक्षरी

०१.०६.२००९
अंक : २९

गर्दीतही जेव्हा कुणाच्यातरी आठवणीने जीव एकटा होतो
अन नकळत ओठांवर शब्दं येतात..

*I MISS YOU*

तेव्हा बरसणाऱ्या विरह अन आठवणींच्या काव्यधारा
घेऊन आलोय नेटाक्षरीच्या ह्या अंकात



## ह्या अंकात वाचा....



हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी..
netaksharee@gmail.com

# अतिथी संपादकाच्या लेखणीतून..



**मी** प्राजक्त देशमुख..मी गोदातटेवरचा.कविता कधी , कशा सुचू लागल्या हे माझ्या लेखणीलाच माहिती.

पण शाळेमध्ये असतांना कुसुमाग्रज पाठीवर हात ठेऊन 'लढ' म्हणाले आणि कविता कशाशी खातात हे प्रथम कळाले.पुढे रंगभूमीवरुन पहिल्यांदा नायकाच्या भूमिकेत असतांनाही नायिकेसाठीच्या बऱ्याच कविता माझ्या तोंडी असत.तेव्हा एक गोष्ट कळाली की, कविता आणि रंगभूमी हे आणखी नवीन अंग आपल्याला उगवलेत.नाट्यकर्मी असल्याने माझ्या कवितेत नाट्यमयता असते की माझी नाटकं काव्यात्मक असतात हा निर्णय मला कधीच करता आला नाही,वरपेक्षा मी तो कधी केलाच नाही.अहो,वरणात भात कालवा किंवा भातात वरण..चव बदलत नाही.पोट मस्त भरते ह्यात शंकाच नाही.आणखी पुढे गुलजारांनी हात धरुन कवितेचे अंतरंग दाखवले.आणि,काव्यांजली कम्युनिटीने काव्यात रंगलेलं नवीन कुटूंबदिले.

जेव्हा ह्या अंकाचे अतिथी संपादकत्व माझ्याकडे आले तेव्हा अंकासाठीचे अनेक विषय मनात घोळत होते.पण,अखेरीस विरहाशी माझे मनोमिलन झाले.विरह म्हटलं की,एखाद्या चित्रपटात आसवाची टिपं गाळत झाडाभवती फिरणारे,रात्री सुनसान सडकेवर चालणारे नायक,नायिका डोळ्यांसमोर येतात किंवा असा कुणीही महाभाग ज्यावर विरह कोसळलेला असतो.ह्या पारंपारिकतेला छेद देणाऱ्या कविता कशा असू शकतील ह्याचा मी विचार केला.आणि मला कळले की,माझ्या आधीच कितीतरी ऑर्कुट कवी,कवयित्रींनी असा विचार केलाय आणि तशा सरस कविता लिहल्याही आहेत,ज्या ह्या अंकात समाविष्ट करत आहोत.

तरी काही काही अशा ओळी,पुस्तकांची पानं डोळ्यांसमोरुन फर्रार्टत पलटली.विरहाची 'तशी'ही ओळख जाणकारांनी आपल्यापुढे कधीच मांडलेली आहे,हे आठवले.

वडीलधाऱ्या या पायांना , शताधिकांचे हात स्पर्शती
खंत एक की,उरला नाही , हात एकही,खांद्यावरती

- कुसुमाग्रज

आपले खास कट्टेवीर मित्र आता नाही असा विरह शब्दांत मांडणारे,आपल्यासारख्या कविप्रेमींना उगाच प्रिय नाही ही ह्याची पावतीच ! काही वेळेस एकट्यानेच गेला आणि परत भेटायची वेळ आली की,असेही ऐकायला मिळते..

लाजमी था कि देखो मेरा रस्ता कोई दिन और
तनहा गये क्युं,अब रहो तनहा कोई दिन और

- मिर्जा ग़ालिब

असाही विरह कधीतरी लादला जातोच,पण त्यातही एक अनोखी अदा

विरह हा काही दूर गेलेल्यांमध्येच नसतो,कितीदातर जवळ राहूनदेखील पूर्वीसारखी 'भेट' नसते.

कहां छुपादी है रात तूने
कहां छुपाये है तूने गुलाबी हाथोंके ठंडे फाये
कहां है तेरे लबों के चेहरे
कहां है तू आज कहां है
यह मेरे बिस्तरपे कैसा सन्नाटा सो रहा है ?

- गुलजार

अशी शरीरं जवळ असून सुध्दा मनं दुरावली जातात,तो विरह सर्वात त्रासदायक.कधी कधी मला ह्या दुराव्यातही आशावाद दिसतो.

जैसे इन हाथों का,वोही इन उंगलियोंका
अजीबसी दूरी,अजीबसा अंतर
इन्हीं उंगलियोंकी दुरियोंमें मैने भर दी , तुम्हारी उंगलिया
कि ये कह मुमकिन था..जब ये दूरी ही ना होती
इन्हीं दूरियोंने हमें एक दूरी रखकर एक रखा होगा







खरे तर,अतिथी संपादक मधला अतिथी शब्द ऐकून आपल्याच घराच्या दाराबाहेर पादत्राणं काढुन आत आल्यासारखे वाटले.मी तर दाराच्या आत बूट काढणारा कुटूंब सदस्य..काव्यांजलीचा कुसुमाग्रज आणि गुलजार ह्यांच्या प्रत्येकी एक कवितेचा समावेश ह्या अंकात समाविष्ट करण्यापासून मी स्वतःला रोखू शकलो नाही.नकळत त्यांनी माझ्या कवितेवर जे संस्कार केलेत त्याचा हा नकळत एक ऋणनिर्देश..असं समजा हवं तर.बाकी काव्यांजलीचे दर्जेदार कवी कवयित्रींचे तेवढेच दर्जेदार काव्य ह्या अंकात ओघाने,हक्काने येणारच हे सांगणे न लगे.जसे सूर्य दर्शन पूर्वेलाच..एवढ्या हक्काने.

आणि ह्या अंकासाठी मला अतिथी संपादकपदाचा बहुमान दिलात त्याबद्दल काव्यांजलीचे ऋण व्यक्त करतो. विशेषतः स्वप्ना आणि नामुदांचे.

विरह म्हटला की दुरावा आला,आर्त हाक आली
वाट बघणं आलंच,आठवणींचे तांडे आलेच,डोळ्यांआडून पारा आलाच

# विरहाच्या काव्यमय अग्निधारा

..काल घरातून माझी जुनी ब्रिफकेस गेली..

चोरही पाहून वरमला असेल
म्हणत असेल,आज दरिद्रीच्या घरात चोरी झाली
पाहिले तर त्यामध्ये काहीच नव्हते आणि
पाहिले तर माझी जिंदगी त्यामध्ये साठलेली
एक जुनी जीन्स होती
पायाखाली येऊन येऊन तळव्याजवळ फाटलेली
एक तुझं रेखाचित्र होतं तुला आठवतांना मी काढलेलं
कोणाला पटलं नसलं तरी
मला ते तंतोतंत तुझ्यासम भासणारं
मी डोळयात बघताच
माझ्याकडे पाहून हसणारं
आणि एकही दिवस विसर पडला तर
नाक मुरडून रुसणारं
तू स्वतः कधी बोलली नसशील
एवढं ते चित्र मजसवे बोलायचं
एवढं मात्र नक्की की
त्याला पाहून छातीत काही तरी सलायचं
तू दिलेला पेनही आज गेला
त्या पेनाने मी कितीतरी कविता तुझ्यासाठी लिहलेल्या
किंवा असं म्हण की त्या पेनाला पाहून मला त्या सुचलेल्या
त्यासोबत गेलं तुझं ते एकुलतं एक पत्र
तू रात्री जागून लिहलेलं
तुझ्या प्रेमाने काठोकाठ भरलेलं
कित्येकदा माझ्या छातीला लागून निजलेलं
वाचतांना नकळत अश्रूंचा थेंब पडून थोडसं भिजलेलं
कधीही चोरला जाणार नाही असा
तुझ्या आठवणींचा ठेवा मी डोळयात भरला आहे
काल आठवणींचे शरीर चोरीस गेले
आत्मा मात्र जसाच्या तसा माझ्याकडे उरला आहे

- दीपक इंगळे,पुणे

..दूर राहिले गाव..

दूर राहिले गाव
सखे गं,पैलतीरी
उरले ओघळते घाव
सखे गं पैलतीरी,दूर राहिले गाव

आकाशीचा रंग गहिरा
त्यात निखळला एक सितारा
मागितले मी सुख तुझे अन
पुसले माझे नाव
सखे गं पैलतीरी,दूर राहिले गाव

मुक्या सूरांतील अर्थही चुकले
पुन्हा उरातील श्वासही थकले
जुन्या घरातील नवी सोंगटी
उधळून जाते डाव
सखे गं पैलतीरी,दूर राहिले गाव

- मंदार चोळकर,पुणे







..आय मिस यू..

तुझी आठवण येते
शब्द फक्त तीनच
पण गाठतात खोली
एका जाणिवेची अत्युच्च

जातात डोळयांतून थेट
कवाडा पाशी ह्रदयाच्या
अंर्तनाद उमटतो
झंकारतात दाही दिशा

समरसतेच्या बोलीतून
बांधलेले रेशमी बांध
माझ्या प्रत्येक श्वासाला
तुझ्या आठवणींचा गंध

परतीचा रस्ता नसतो ना
असते फक्त समर्पण
माझ्याभोवती असेल आता
फक्त तुझ्या आठवांचे आवर्तन

- स्नेहा (देवराई),मुंबई

तुझ्यापेक्षा कधी कधी तुझा विरह हवाहवासा वाटतो
जेव्हा भेटतो
तू असते एकाच ठिकाणी,माझ्या डोळयासमोर..
आणि जेव्हा तू नसतेस
जळी,स्थळी,काष्ठी,पाषाणी
तुझाच निवास असतो

- मिलिंद लांजेवार,मुंबई

..अस्फुट..

तुझ्या रंग मेघांचे का
आज काठ अंधारले
तुझ्या हास्य वीणेवर
चंद्र नाही झंकारले
मग्न तुझी आज काया
श्वास दाटले साठले
तुझ्या मुक्त आभाळाला
गूढ कोणते भेटले
तुझ्या गर्द छंदी रेषा
आज जांभळया सावळया
आज का न उमलून आल्या
तुझ्या मधुरंगी कळया
दोन चांदण्यात ओल्या
शब्द साचूनिया राही
शुभ्र बोल काठावर
मौन भरुनिया वाही
शब्दांतून हेलावे ना
आज खुळा पारिजात
दिव्या पणत्यांच्या गावी
आज अंधाराची वात
नक्षत्रांच्या वेशीवर
घन अंधारुन आले
चांदण्यांच्या वेलीवर
चंद्र कोमेजून गेले
आसुसल्या श्रुति साऱ्या
मेघ रासले ध्यासले
ऐकण्यास मध वचनेही
गंध दाटूनी आसले
दिवे रेशमी किरणांचे
रिक्त त्या क्षणात फुलले
सांज वेळी गोपुरांवर
रंग केशरांचे झुलले
पाऊले ही वळता सारी
शब्द ताटवे विरघळले
काय बोलायचे होते
अश्रूतून विरले ढळले
भेट अशब्दांची होती
भाव अंतरी वदळले
गूढ अंतरीचे आश्रित
धुंद अस्फुटातून कळले

- श्रीपाद देशपांडे,नाशिक

या सौद्यातील नफा तोटा
नाहीच तसा लपण्यासारखा
तुझ्या प्रेमात मला मिळाला
एक विरह जपण्यासारखा

- अभिजीत नागले,नागपूर

## ..प्रेमाचा केऑस..

मला तिच्याशी बोलायला खुप आवडतं
ती म्हणते,
पाऊस मला आजकाल पूर्वीसारखा आवडत नाही
दिवसभर दोन क्षणही नसतो माझ्याबरोबर
रात्री मी लाडात येते तेव्हा
ओव्हरटाईम जास्त झालाय,थकलोय असं सांगून वाहून जातो
मग तू काय करतेस ?
मी काय करणार
त्याची नजर चुकवून जाते समुद्राकडे
तोही मग चिडवतो
पाणी खारट असलं तरी तुझंच होतं
आता गोड पाणी किती जणांबरोबर वाटून पितेस ?
मग रात्रभर तो सर्वांग शहारत रहातो माझं
पहाटेला त्याच्या खारट पाण्यात
माझेही दोन थेंब टाकून मी येते निघून
तुला भिती नाही वाटत,पावसाला कळालं तर
भिती कसली त्यात ?
पावसाने समुद्राकडून बरंच कर्ज घेतलंय
ते फिटेपर्यंत तरी चिंता नाही
पण फार कंटाळा येतोय मला सगळ्याचा
आता वाटतंय की आकाशाला जाऊन भेटावं
आकाशाला कुठे भेटणार तू ?
तिथेच,जिथे तुला कविता सुचतात
मग आकाशाला तुझ्यापासून दूर नेईन
त्याला थोडं शहाणपण देईन
मग तुला तो विरहगीते नाही सुचवणार
किती खुश होशील ना तू ?
नाही गं,मी खुश नाही होणार
माझा श्वास अडकल्यासारखं वाटेल मला
वाटायचं तर वाटू दे
मग आपण दोघं मिळून श्वास पकडायला धावू
मीच जिंकेन
हो तूच जिंकशील
तुला नाही वाटत का रे माझ्याबद्दल वाईट ?
मी म्हणतो माहित नाही
आळशीचेस आणि परावलंबीसुध्दा
चल जाऊ दे
पुन्हा घंटा झाली,तू जाशीलच आता
उद्या आठवणीने ये
आणि मला माहितीये,समुद्रानी तुलाही कर्ज दिलंय
सांडतय..
ती निघून जाते आणि
मी बघत राहतो सावल्या
मग खुप विचार केल्यावर स्वतःशीच म्हणतो
कविता सुचायला लागलीये,आकाश वाट पहात असेल

- शंतनु चंद्रात्रे,बंगलोर




## ..तुळशीपत्र..

विस्तारलाय आसमंत
भरकटले पक्षी
तुजविण मन
लागेल कसे मोक्षी

थांबलीय वेळ
गोठलेय क्षण
ह्दयी कटू
आठवांचे व्रण

प्राक्तन कोषात
हरवलेय शब्द
आत्मा सोडून
देह तसाच स्तब्ध

प्राणांची दक्षिणा घेऊनी
वाट बघतोय देव
आतातरी या आत्म्यावर
तुळशीपत्र ठेव

- विक्रांत उमप,बेलफास्ट(यु.के.)

## ..नगरवधू..

पुन्हा पुन्हा आठवतात
तुझे अतृप्त डोळे
आणि तुझेच घायाळ स्वप्नपक्षी
का रे असे अश्रू ढ़ाळते ?
का रे मग भग्न ह्दय जळते ?
दूर दूर तुझे रे गाव
शृंगारुन बसला जीव
येणाऱ्याचा ना ठाव

- अशोक कृष्ण,नागपूर

## ..तुझा मारवा..

लाकडी खिडकी
लोखंडी सळया
टेकवलेलं डोकं
परतीला पाखरं

कुणी गात असो नसो
तुझा मारवा घुमतो कानात
कानात ?
साऱ्या देहभर

एरव्ही नसेल पण मारव्याला पटत असावं तुझं माझं

जाब दयाघनाला,का तुटले घरटे ?

तुझी मान डोलायची
डोळ्यांदेखत,तू अस्पष्ट
डोळे गच्च करुन उघडले की पुन्हा तू
आता पुन्हा गच्च डोळे उघडले की वाटतं,तू असशील

पण,
कुणी गात असो नसो
तुझा मारवा घुमतो कानात

आणि मी,
लाकडी खिडकी
लोखंडी सळया
टेकवलेलं डोकं
परतीला पाखरं

- प्राजक्त देशमुख,नाशिक

..दुरावा..

पारवा मनाचा धुंद गीत गातो
अन त्यात सख्या मज तव भास होतो
क्षणभरही राहवेना दूर तुझ्यापासून
इतुक्या दिसांचा दुरावा मज युगांसम भासतो

तुझेच शब्दं दिनराती
जिवलगा कानात गुंजती
समजून घे रे सख्या
माझ्या ह्रदयातील प्रिती

कुस बदलत शय्येवरती
आता मी जागणार राती
स्वप्नातही कशी भेट होणार रे राजसा ?
आठवात तुझ्या नयनांची द्वारं रातभर तेवती..

- ॲड.पल्लवी राऊळ,मुंबई




..तिचा एक अनुत्तरित प्रश्न..

ती जातांना भिजल्या नव्हत्या
माझ्या पापण्यांच्या कडा
ती गेली हसत अन
दुनिया म्हणाली,बघा वेडा
अजूनही ती म्हणते की
त्याक्षणी मी रडलोच नाही
तिच्या विरह वेदनेच्या पाशाने
मी कधी वेढलोच नाही
ती आजही एकच प्रश्न विचारते मला
सांग ना रे,रोज स्वप्नात कुणाला पाहतोस ?
विचार येतो तेव्हा मनात
काय बरं देऊ उत्तर तिच्या या प्रश्नाला ?
कारण ती सोडून गेल्यानंतर
जर मी आजवर कधी झोपलोच नाही..

- सचिन काकडे,मुंबई

..तू गेल्यानंतर..

तू गेल्यानंतर सगळं आयुष्यंच विस्कटून गेलं
परतीच्या वाटेवर डोळ्यांमधून वाहून गेलं

तुझ्या वाटेवरुन नजर काही केल्या हटेना
ओझरणाऱ्या तुला डोळ्यांत पूर्ण साठवत गेलं

केवळ क्षणांचा नाही तर आयुष्याचा विरह हा
अखेरचं हसू माझ्या चेहऱ्यावरुन निघून गेलं

सहवासाचे क्षण असे नेहमीच जाळत राहणार
तुझ्या दुराव्यातून मला तेही उमगत गेलं

साऱ्या प्रश्नांना उत्तर,साऱ्या संकटांचा अंत
माझ्याच कोड्याला सोडवायचं राहून गेलं

मार्ग आता वेगळा सख्या,नको वळूस पुन्हा
काय करु मग ?जर मन परत गुंतत गेलं ?

- जुई मयेकर,मुंबई

..आभाळबाबा..

आजी म्हणायची,आभाळबाबा बघतोय बरं वरुन
चोरुन साखर खातांना
बयो बाईच्या अंगणात आंबे चोरतांना
डबक्यातली बेडकं दगडांनी मोजतांना
आजी आजारी होती शाळेत कारण सांगतांना
वाटेतल्या खड्ड्यावर झावळ्या टाकतांना
त्यावरुन आपटल्यावर फिदफिदतांना
नजर हळूच वर जायची
ढगातून कुणी बघतं का ?
ढगातून कुणी बडबडतंय का ?
मग हळुहळू कमी झाले..वर बघणे नाही
आंबे चोरणं,बेडूक मोजणं वगैरे वगैरे
शाळेत मारामाऱ्या झाल्या की,मी वर पहायचा
कापूस डावीकडून सरकत उजवीकडे जायचा
वाटायचं आता आभाळ बाबा रागवणार
त्या गडकऱ्याच्या पावट्याला बदडणार
तो बदडून निघून जायचा
मी शिवाईच्या डोंगरावरुन आभाळबाबाला दगड मारायचा
इतक्यात कुठे वीज बरसली
अन पावट्याची घराची कौलं सरकली
मी हसत किनाऱ्यावरुन नाखव्याला ओरडून सांगायचा
हुडी आभाळाला टेकल तेव्हा आभाळबाबाला पत्ता दाव घरचा
एकदा आजी निघून गेली
होती तिथंच पण आपले म्हणायचे निघून गेली
मी म्हणायचा बोलवा माघारी
आई रडायची गेली रे तुझ्या आभाळबाबाच्या घरी
मी शिवाईवरुन बोंब ठोकायचा
नाखव्यासोबत चक्कर मारायचा
तो काही बोलंना
बोलायला तो काही भेटंना
मग मी सुरु केलं परत
बेडकं मोजायला
झावळ्या तोडायला
नारळावर चढून पाणी संपवायला
बयो बाईला नको नको करायला
सगळे म्हणायचे,आजीनेच ठेवलं होतं शेफारुन
पण मला माहिती होतं
आजी म्हणायची,आभाळबाबा बघतोय बरं वरुन

- प्राजक्त देशमुख,नाशिक

..प्रेमाचा चौथरा..

तू भेटावीस म्हणून रोज ह्याच चौथऱ्यावर येतोय
तू भेटशील नक्की असे तो चौथरा देखील म्हणतोय
तीच रात्र अन तोच तुझ्या आठवणीचा दिवस
तू नक्की परत येशील असे तेच भाबडे नवस
तुझा विरह आता मला सहन होत नाही
मला काय होतंय ते सांगता पण येत नाही
हाती उरलंय फक्त तुझ्यासाठी चौथऱ्यावर बसणं
डोळ्यातल्या अश्रूबरोबर तू येतांना दिसणं

- शिवाजी ढोले,कोल्हापूर




नुसता कुणाला सांगता यावा
म्हणून तुझा विरह जपत नाही
दुसऱ्या देहाचा तर विचारच सोड
मला दूसरे नावही खपत नाही

- अभिजीत नागले,नागपूर

## ..जाग पोरकी येते..

स्वप्नात कधीतरी दिसते माझे गाव
तो नदीकाठ,माझी तशीच सुसाट धाव
ते वळण ओलांडूनी मी,माहेराला जाते
दाराची चौकट रिक्त,दुःखाने घुसमट होते
आई आई करते,आक्रंदते,पुढे पुढे जाते
स्वप्नातल्या स्वप्नी आई लगबग दारी येते
अगं बाई अवचित आलीस आनंदून म्हणते
पायावर पाणी देते,घास उतरवूनी टाकते
आईच्या कुशीत शिरुनी लटकेच मी चिडते
होतीस कुठे गं आई रडता रडता पुसते
हे कसले लपणे कळत नाही का तुला
थट्टा ही कसली ,जीव किती व्याकुळला
मुसमुसते,स्फुंदते,आईस घट्ट बिलगते
रडता रडता कधीतरी जाग पोरकी येते

- शैलजा शेवडे,नवी मुंबई

## ..जातोच आहेस गावाकडे तर..

जातोच आहेस गावाकडे तर
वेशीवरल्या सह्याद्रीला सांग नमस्कार माझा
म्हणावं,तू ढाल होऊन उभा आहेस तिथे
म्हणूनच लढतोय इथे मावळा तुझा
वेशीवरनं एस.टी आत वळेल
अलगद अडखळत माझ्या गावात घुसेल
माझे गाव,माझे जग
सारं डोळ्यांनी टिपून घे
कणकण साचवून शिदोरी बांधून घेऊन ये
जातोच आहेस गावाकडे तर
माझ्या घरीही जाऊन ये
दारात माझे मुके जनावर असेल माझी वाट बघत
थोपट त्याला प्रेमाने अन
येतोय म्हणून सांगून ये
घरी माझी आई असेल
तिला म्हणावं,काळजी घे
साचलीच माझी आठवण डोळ्यांत तिच्या
तर ती माया थेंबभर घेऊन ये
थोरला भाऊही भेटेल माझा
काही बोलू नकोस,वाकून नमस्कार कर
त्याच्या पायाखालची चिमूटभर धूळ घेऊन ये
एवढं माझं काम कर
जातोच आहेस गावाकडे तर
तर लवकरच परतून ये
दूर इथे मी हळवा व्याकुळ
गावाकडचे सुख तेवढे घेऊन ये

- सूरज देशपांडे,मुंबई



## ..सुस्वागतम..

नुसते डोळे बंद केले तरी
तुझे उष्ण श्वास जाणवतात
नुसता तुझा रुमाल पाहून
माझे डोळे पाणावतात

ओळखीचे लोक भेटले की
त्यांचे डोळे काही खुणावतात
तुझं चुकलं का माझं ?
असले प्रश्न मला सतावतात

घरभर पसरलेल्या तुझ्या वस्तू
निदान कपाटात ठेवता येतात
आयुष्यभर पसरलेल्या आठवणी
कधी कोणाला सावरता येतात ?

आठवतंय आपल्या माळ्यावरचं
चिमणा चिमणीचं घरटं
चिमणा उडून गेलाय आता
वाटतंय एकटं एकटं

घर सोडलं , शहर सोडलं
आठवणी पाठ सोडत नाहीत
काही धागेच इतके चिवट असतात
तोडू म्हटलं तरी तुटत नाहीत

मृत्यूने दूर केलं असतं तर
भांडलो असतो यमराजाशी
एकदा तरी मागे वळून बघ
अजूनही सुस्वागतम लिहीलंय दाराशी

- दीपा कुलकर्णी मिट्टीमनी,कॅनडा



## ..आज माझ्या देशात..

आज माझ्या देशात,दिवाळी असेल जोरदार
रांगोळ्यांच्या रंगात रंगली असतील घरदार
आज माझ्या देशात खुलत असतील अनार
लक्ष लक्ष दिव्यांनी आज देश माझा उजळणार
आज माझ्या देशातले लोक उठले असतील लवकर
पहाटेच्या अंघोळी,काटा फुलतो अंगावर
आज माझ्या देशात हट्ट करत असतील पोरं
हजारचीच लड हवी,नाहीतर बोलणार नाही,बघ बरं
आज माझ्या देशात बनले असतील अनारसे
चिवडा,लाडू,करंज्या अन पूजेसाठी बत्तासे
आज माझ्या देशात आजोळी मज्जाच मज्जा
इवल्याशा किल्ल्यांवर बसतील शिवाजी राजा
आज माझ्या देशाला येत असेल का माझी आठवण
लवंगी लड लावतांना आठवेल का माझे बालपण
थरथरत्या हातात तडतडी फुलझड
अन घाबरु नकोस म्हणणारी घट्ट पकडण
आज 'या' देशात रोजच असे दिवाळी
लख्ख प्रकाश अन थंडी कडक हिवाळी
आज या देशात पक्वान्न अनेक घरोघरी
पण मायेनी वाढणारे हात नाही माझ्या घरी

- निखिल कुलकर्णी,पुणे

## ..बाकी सगळं ठीक आहे..

बाकी सगळं ठीक आहे,तू निघून गेल्यानंतर,बाकी सगळं ठीक आहे

अजूनही पूर्वीसारखाच दिवस येतो,रात्र होते
चंद्र मावळतो,सूर्य उगवतो,फुले फुलतात इ.इ.
पण हल्लीची पहाट मात्र गंध तुझा देत नाही
आणि रात्री भिंतींशी बोलतांना,झोप काहीकेल्या येत नाही
बाकी सगळं ठीक आहे

रोजच्यासारखंच आयुष्य फिरतं,त्याच्यापाठी धावत असतो
रुटीन पाळतो,कधी दैनंदिनीदुध्दा लिहतो
पण मध्येच पैंजण वाजल्यासारखा उगाच तुझा भास होतो
आणि पाऊस दाटून आला म्हणजे अजून थोडा त्रास होतो
बाकी सगळं ठीक आहे

अंगणातल्या पारिजातकाचा बहर थोडा कमी झालाय
तरीसुध्दा काही फुलं सांडतात अधूनमधून
पण कुंडीतली ती तुळस मात्र पूर्वीसारखी फुलत नाही
आणि भिंतीवरच्या फोटोतला तो कृष्ण हल्ली फारसा हसत नाही
बाकी सगळं ठीक आहे

देवघरात धूळ साचलीये,फ्रिजचा दिवा गेलाय
दोन शर्टसची बटणं तुटलीत,मोजे धुवायचे राहिले आहेत
बेसिनचा नळसुध्दा सारखा टपकतोय

मूठ घट्ट धरली तरी जगणं हातून सुटत जातंय
आणि खोलखोल आतमध्ये रोज काहीतरी तुटत जातंय
बाकी सगळं ठीक आहे, बाकी सगळं,खरोखर ठीक आहे

- ज्ञानेश पाटील,जळगाव

# अतिथी संपादकाचा परिचय..





- **सर्वोत्कृष्ट अभिनेता** -

गुजरात राज्यस्तरीय एकपात्री स्पर्धा एन.एस.एस.
मराठी एकपात्री स्पर्धा
'अश्वमेध' थिएटर्स,नाशिक ह्या संस्थेमधून रंगभूमीची सेवा
ह्याच संस्थेकडून केलेल्या 'सहर - एक पहाट' ह्या एकांकिकेसाठी विभागीय/राज्यस्तरीय सर्वोत्कृष्ट प्रकाशयोजनाकार

- **सर्वोत्कृष्ट दिग्ददर्शक** -

सहर - एक पहाट,वन्स अपान अ टाईम,मिडनाईट शो,समथिंग ग्रे ह्या अनेक विभागीय तसेच राज्य पुरस्कार विजेत्या एकांकिकेचे सहदिग्दर्शन व अभिनय
स्वरचित काव्यवाचन स्पर्धा (हिंदी) - गुजरात विजेता
मराठी काव्यवाचन स्पर्धा - प्रथम विजेता

- **भविष्यामधील काही वेध** -

'अश्वमेध' मधून अनेक नवीन प्रयोगशील नाटकं,एकांकिकांचे दिग्ददर्शन,अभिनय तसेच पुढील सत्रासाठी नियोजन सुरु
एकांकिका लेखनासाठी अभ्यास तसेच ललितलेखनात कार्यरत



'पु. ल. महाकरंडक'



.. तू नाही नाही चे सुटले वारे..

तू नाही नाही चे सुटले वारे
आली संध्या कुंकू पुसूनी
मावळतीचे रंग बेरंगी
पश्चिमेस कोसळे मेघमनोरे
तू नाही नाही चे सुटले वारे

काय करु अन काय नको ते
सांग जिवलगा , भरले डोळे

कलकल कलकल कुजन कानी
विहंगाचे थवे कावरे
अशात घट्ट हात धरुनी
मारवा नेई दूर मजशी
कोण देश,दिशा अन कुठली
ठाऊक नसे मजला काही
जाणे जाणे दूर दूर हे
सूर नसे रे,घाव हे दुखरे
आता ना ह्रास अंत काही

उरली कातरवेळ पिसाटशी
अन उरली एक मी दिवाणी
तू नाही नाही रे तू नाही कुठेही

तू नाही नाही चे सुटले वारे

- स्वप्ना कोल्हे,नाशिक



# संपादकीय..

ना है ये पाना, ना खोना भी है , तेरा ना होना , जाने , क्यूं होना भी है..

विरह काय असतो ? दुरावा..निर्माण केलेला की झालेला ? आपण म्हणतो,अमुक माणसं मला दुरावलीत.पण,मग शरीराने जवळ असलेली माणसं खरोखरच आपल्या मनाच्या जवळ असतात ?अवघड आहे ना उत्तर ? दोस्तहो,प्रश्न नेहमीच सोप्पे असतात.हम्म,जाऊ देत..तर असा हा विरह अन त्याची ही कहाणी.विरहाला एका ठराविक साच्यात बसवणे अयोग्यच.कारण प्रेम जसे वैश्विक आहे तसंच विरह देखील.मग विरह प्रिय व्यक्तिंचा,वस्तूंचा,स्थळाचा कशाचाही असू शकतो.त्याला वयाचे,धर्माचे कशाचेही बंधन नसते.ह्या विरहाची ओळख खरं तर लहानपणापासूनच होते.जेव्हा आवडती खेळणी हरवते किंवा हिरावून घेतली जाते किंवा मोडते अन मग टपोऱ्या डोळ्यांतून गोबऱ्या गालांवर धावलेलं खारट पाणी पहिल्या वहिल्या विरहाची चव चाखवतं.

विरहरुपी हा नावडता पाहुणा मग सावकाशीने पुढे आयुष्यात ह्रदयातल्या एखाद्या अंधाऱ्या कोपऱ्यात कायमस्वरुपी मुक्कामीच येतो.आपल्या सर्वांनाच तो निरनिराळ्या रुपांत भेटतो.शिक्षणाच्या निमित्ताने गाव सोडून शहरात जायचं असल्याने गावाशी होणारी ताटातूट अथवा एकाच शहरात असूनदेखील वेगळ्या शाखेमध्ये प्रवेश घेतल्याने झालेला सवंगडींचा विरह.उच्च शिक्षण वा नोकरीच्या निमित्ताने परदेशगमन केल्याने मातृभूमीचा विरह.चोरपावलांनी मिठीत घेणाऱ्या प्रेमाच्या बरोबरीने चालत आलेली विरहाची राक्षसी पावले तर अनेकदा नाजूक ह्रदयावर चाल करुन जातात.प्रपंचात पडल्यावर प्रामुख्याने माहेराचा विरह स्त्रियांना सतावतो तर सांसारिक जबाबदाऱ्या सांभाळतांना पुरुषांचे मन भूतकाळातील स्वच्छंद आठवणींने विरही होते.वृद्धापकाळ तर विरहाची जत्राच भरवतो.

तर असे हे विरहाचे अनेक प्रकार.अन मग गर्दीतही आपण एकटे अगदी एकटे होऊन जातो.नजर शून्यात स्थिरावते.येतेजाते श्वास त्या प्रियाच्या आठवणींची माला जपत राहतात.अन दूर एखाद्या ओल्या हिरव्या रानात कोवळी कळी फुलावी तसे एकांतात शब्द उमलतात.I Miss You. मग ते i miss my college,i miss my village/country,i miss my youth,i miss my friends, i miss my husband/wife,i miss u darling काहीही असू शकतं.

ज्या प्रिय व्यक्तीला,वस्तूला miss करतोय त्याच्यापर्यंत ते पोहचावं हे जरुरीही नसतं,आठवणींच्या जत्रेत हरवलेलं मन काहीच मागत नाही..एक त्या प्रियाशिवाय.. सोबतीला असते गडद वनात दाटलेल्या अंधारासारखी उदासी अन रक्ताळलेल्या अश्रूंचे ओले सुके ओघळ.

नेटाक्षरीचा हा अंक अशाच विरही भावनांना शब्दांत गुंफलेल्या कवितांना एकत्रित आणण्याचा प्रामाणिक प्रयत्न.

**- स्वप्ना कोल्हे,नाशिक**
**[ संपादक ]**

## ‘काव्यांजली’ आणि ‘मराठी कविता’ तुमच्यासाठी घेऊन येत आहेत

# नवरस काव्यस्पर्धा मालिका

यात आहेत साहित्यातील नऊ रस.प्रत्येक स्पर्धा एका रसावरील कवितांची.
नऊ रस,नऊ स्पर्धा एक महामालिकाच म्हणा ना !!!
दर महिन्याला एक रस तब्बल नऊ महिने चालणारे ही धम्माल !!!
ह्या काव्यस्पर्धेचा उद्देश चढाओढ हा नाही,कोणी छोटं-मोठं,कविता चांगली-वाईट सिद्ध करणं हा देखील नाही.
ही स्पर्धा आपल्या प्रतिभेला आव्हान आहे,सृजनशक्तीला आवाहन आहे.
निवडक कविता नेटाक्षरीमध्ये प्रसिध्द होतील,हजारोंपर्यंत जातील,बक्षिसेही असतीलच.
लिहा मंडळी,बघूया महाराष्ट्राच्या उद्याच्या ‘लेखण्या’ काय आहेत ते.

## ह्या महिन्याचा ‘रस’ विषय करुण रस

तुमच्या १/२ करुणरसपूर्ण कविता आम्हांला १ जून ते १५ जून २००९ पर्यंत
marathikavitamarathispardha@gmail.com
ह्या ईमेल पत्यावर पाठवा.सोबत आपल्या ऑर्कुट प्रोफाईलची लिंक व ब्लॉगची लिंक नक्की पाठवा.
अधिक माहिती कम्युनिटीवर मिळेल.

काळजाच्या अरण्यात करुण रसाचं वादळ उठू देत
शब्दांच्या करुण किमयेनं हुंदक्यांचा बांध फुटू देत

आपल्या लेखण्यांतून शाईच्या रुपानं कारुण्य काव्यरस वाहू देत

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई साहित्य प्रकाशनाचा ध्यास नेटाक्षरी जोमाने पार पाडीत आहे.दर आठवड्यात मिळणाऱ्या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणित होतोय.नेटाक्षरी हा साप्ताहिक अकं सध्या सुमारे ३५००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो.ह्याव्यतिरिक्त वेबसाईटवर व्हिजीट करुन वाचणाऱ्यांची संख्या लक्षणीय आहे.हा अंक आपण आपल्या मित्रपरिवारास फॉरवर्ड करण्यास आमची काहीही हरकत नाही.सोबतच,असे करतांना आमच्या आयडीचा अंर्तभाव केल्यास आम्ही आपले अत्यंत आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा.आपल्यासारख्या रसिकांच्या साह्याने हा अंक एक लक्ष वाचकांपर्यंत पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.
हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी..
netaksharee@gmail.com